**सन २०२३-२४ राज्य योजनेंतर्गत महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना (२४०६-A१८५) अतंर्गत निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.बांबूसा-२०२३/प्र.क्र.७१/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १३ मार्च, २०२४

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२ एप्रिल, २०२३
२. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/नबाप्र/प्र.क्र.७/५५/२०२३-२४, दिनांक २५.०४.२०२३
३. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.७१/फ-९, दिनांक ०४.०५.२०२३
४. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.७१/फ-९, दिनांक १२.०७.२०२३
५. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.७१/फ-९, दिनांक २०.१०.२०२३
६. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/नबाप्र/प्र.क्र.७/७५५/२०२३-२४, दिनांक ०६.१२.२०२३
७. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.७१/फ-९, दिनांक ०२.०१.२०२४
८. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/नबाप्र/प्र.क्र.७/१००३/२०२३-२४, दिनांक ०९.०२.२०२४
९. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. ०४ मार्च, २०२४

**प्रस्तावना :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना (२४०६-A१८५) या लेखाशिर्षाअंतर्गत रु.१२००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत आहे. वाचा येथील क्र.३,४,५ व ७ च्या शासन निर्णयान्वये उपशिर्षनिहाय एकूण रु.५९८.७० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या वाचा येथील नमूद क्र.९ चे परिपत्रकान्वये सन २०२३-२४ आर्थिक वर्षाच्या उर्वरित कालावधीसाठी अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत तरतूदींचा उर्वरित संपूर्ण निधी सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत १००% इतका उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून वाचा येथील क्र.२ व ८ च्या पत्रान्वये उपशिर्षनिहाय रु.१२००.०० लक्ष इतक्या रकमेचा चालू बाब प्रस्ताव प्राप्त झाला असून अनुदान उपलब्ध करुन देण्यास विनंती केली आहे. त्यानुसार या कामासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून वाचा येथील क्र.२ व ८अन्वये सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाचे वाचा येथील क्र.१ व ९ येथील परिपत्रकानुसार बीम्स प्रणालीवरील निधी उपलब्धता विचारात घेता, प्रस्तावातंर्गत मागणी लक्षात घेऊन, सन २०२३-२४ करीता महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना (२४०६-A१८५) या योजनेमधून व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर यांचेकडील वेतन व इतर बाबींवरील खर्च

भागविण्याकरिता खालील तक्त्यात दर्शविण्यात आल्यानुसार उपशिर्षनिहाय **रु.३५८.२० लक्ष** इतका निधी खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

| **सविस्तर शिर्ष (२४०६-A१८५)** | **या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा निधी** |
|---|---|
| ०१-वेतन | ७६.२० |
| ०२- मजूरी | १८१.०९ |
| ०३-अतिकालीक भत्ता | ०.२० |
| ११-देशांतर्गत प्रवास खर्च | ४.६२ |
| १३-कार्यालयीन खर्च | ३६.९६ |
| १४-भाडेपट्टी व कर | ३.७० |
| २८-व्यावसायिक सेवा | ५५.४३ |
| **एकूण :-** | **३५८.२०** |

**अटी व शर्ती:-**

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.
२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.
३. सदर योजनांतर्गत प्रस्तावित कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.
४. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
५. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
६. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करावे.
७. सदर आर्थिक वर्ष २०२३-२४ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.
८. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.
९. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांनी उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.
१०. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

११. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ व ०४.०३.२०२४ रोजीचे परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

१२. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

१३. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत तरतूदी तसेच प्रचलित कायदे व नियम मधील तरतूदींचा भंग होणार नाही याची दक्षता घ्यावी.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक मागणी क्र.सी-७, ०१-वनिकरण प्रधान शिर्ष- २४०६, वनिकरण व वन्यजीवन, १०५ वनोत्पादने, (०१) शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन, (०१) (०८) महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना (२४०६ A१८५) या लेखा शिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ व ०४.०३.२०२४ चे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१४१३०२०४८६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=Personal, title=4179,
pseudonym=133142602957487084g5f8e27R5OJA8P,
2.5.4.20=d2eb76cc3763a845a8edf9b9dde07f42d90c6bc17db755d4af91632f6c0b678e, postalCode=414001, st=MAHARASHTRA,
serialNumber=3b1afe499c80878329fbb017e4922f7356cc5edc76102e8ff88c7b9a67a322d9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2024.03.14 13:11:16 +05'30'

**( विवेक होशिंग )**
**उप सचिव (वने), महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर.
४. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५. सह सचिव/उपसचिव,वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
६. उप सचिव, नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
७. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)